**रासायनिक खताचा संरक्षित साठा करण्याकरीता लागणा-या अनुषंगीक खर्चासाठी म.रा.सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक सपस १०१०/४०४/प्र.क्र.४ /२४ स,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ९ जुलै, २०१०**

**वाचा :-** १) कृषि पदुम विभाग शासन निर्णय क्र. राखते ३७०९/ प्रक्र १९५/ १७-अे, दिनांक २८ जानेवारी, २०१०.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : शाहमी-१०१०/सपवव/प्र.क्र.८/अर्थबळ, दिनांक ३ मार्च, २०१०.

३) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक :अंदाज २०१०/ प्र.क्र.६९/१७स, दिनांक २३ एप्रिल, २०१०.

**प्रस्तावनाः-**

खरीप हंगाम २०१०-२०११ करीता राज्यातील शेतक-यांना त्यांच्या मागणीनुसार आवश्यक रासायनिक खताचा पुरवठा संरक्षित साठा करण्याकरीता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेची उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र १ नुसार नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. या कामाकरीता आवश्यक असणा-या कर्जासाठी शासन हमी तसेच अनुषंगीक खर्च या विभागाने उपलब्ध करुन देण्याचा निर्णय कृषि विभागाने घेतला होता. या करिता लागणा-या रक्कमेच्या कर्जाकरिता वित्त विभागाने शासन हमी मंजुर केली आहे. तथापि या कामाकरिता लागणारा अनुषंगिक खर्च या विभागाच्या सन २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पात २४२५ या लेखाशिर्षाखाली रु. २० कोटी तरतूद मंजुर करण्यात आली आहे. या मंजुर निधीपैकी वित्त विभागाने रु. १० कोटी इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शेतक-यांना पुरवठा करण्याठी २.५ लाख मे.टन इतक्या रासायनिक खताचा संरक्षित साठा उपलब्ध करण्यासाठी लागणा-या आनुषंगीक खर्चाकरीता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांना रु. १० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतका निधी वितरण करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. हा खर्च सन २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पीत निधीतून भागविण्यात यावा. हा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्च करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

" मागणी क्र. व्ही -२, मुख्यलेखाशिर्ष २४२५, सहकार, (००) (१०८), इतर सहकारी संस्थांना सहाय्य, (०१) पणन सहकारी संस्था, (०१) (२१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास रासायनिक खते खरेदी व पुरवठा यासाठी येणा-या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य (योजनेतर) (२४२५ २३७ ३) "

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी करीत असल्याबाबत कृषि पणन संचालक, म.रा.,पुणे यांनी खात्री करावी आणि यासंबंधीचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

४.	या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या **रुपये १०,००,००,०००/-(अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) चा धनादेश The Maharashtra State Co-operative Marketing Federation Ltd., Mumbai यांच्या नावे काढण्यात यावा.**

५.	या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता श्री. य.गं.पाटील, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री. ना. ल. तडोसे, सहसचिव, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६.	सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/१०/अर्थ१३, दिनांक ३०.०६.२०१० अन्वये त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७ .	सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००७०९१८०८३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
( ना. ल. तडोसे )
सह सचिव, महाराष्ट् शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

(१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई
(२) वित्त विभाग, ( व्यय-२, अर्थसंकल्प-३ व १३) मंत्रालय, मुंबई-३२.
(३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
(५) कार्यासन अधिकारी (रोख शाखा)सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.(३प्रती)
(६) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई (२ प्रती).
(७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य ,पुणे.
(८) कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी, पणन महासंघ मर्या., कनमूर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, मस्जीद, मुंबई-९.
(१०) मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
(११) मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
(१२) प्रधान सचिव, सहकार व पणन यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई-३२.
(१३) कक्ष अधिकारी, १७ स / संगणक कक्ष, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
(१४) निवड नस्ती, २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.